**A.A. to Restoration of Canal**
**Work of Natuwadi Medium Project**
**(TL. Khed Dist. Ratnagiri)**

**नातूवाडी मध्यम प्रकल्पाच्या (ता.खेड, जि.रत्नागिरी) कालवा प्रणालीच्या पुर्नस्थापनेच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र.निधी २०११/(७७/२०११)/सिंव्य(कामे)
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १९/०९/२०११**

**पहावे :** १) कार्यकारी संचालक, कोपाविम, ठाणे यांचे पत्र क्र.कोपाविम/ता-१/ अेआयबीपी/नातुवाडी/विवसू/१६२, दि.१२.१.२०११
२) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश मुंबई, यांचे क्र.२०११/धा.क्र.ई १६/तां-(३)/१७१४, दि.२८.३.२०११

**प्रस्तावना :**

नातुवाडी मध्यम प्रकल्पाचे काम १९८३ मध्ये पूर्ण झाले. कालवा व अनुषंगिक कामे सन १९९१ मध्ये पूर्ण झाली. या कालव्याद्वारे २०५० हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होतो. सदर प्रकल्पाची सिंचन प्रणाली ही २० वर्षापूर्वीची आहे. या प्रकल्पाचे कालवे डोंगराचे पायथ्याने जात असल्याने व कोकणात होणाऱ्या अतिवृष्टीमुळे डोंगरातील दगडधोंडे व पाणी प्रवाह भराव फोडून कालव्यात येते. त्यामुळे दरवर्षी कालव्यात मोठ्या प्रमाणात गाळ साठला जातो व भरावाचे नुकसान होते. भराव फुटल्यामुळे कालव्याच्या दगडी अस्तरीकरणाचा भाग खराब झाला असून कालव्यावरील दगडी बांधकामे क्षतिग्रस्त झाली आहेत. तसेच वितरिकेची द्वारे गंजली असून दगडी बांधकामे क्षतिग्रस्त झाल्याने मोठ्या प्रमाणात गळती होत आहे. परिणामी २०५० हेक्टर सिंचन क्षमतेपैकी सरासरी १२५ हेक्टर सिंचन होत आहे. त्यामुळे सदर प्रकल्पाच्या दुरुस्तीबाबत लोकप्रतिनिधीच्या मागण्या येत आहेत.

नातुवाडी प्रकल्पाच्या कालवा प्रणाली दुरुस्तीनंतर १९२५ हेक्टर क्षेत्र पुनर्स्थापित होणार असून योजनेचे लाभव्यय गुणोत्तर २.२४ इतके येत असल्याचे विभागाने नमूद केले आहे. तसेच

योजनेच्या विशेष दुरुस्तीनंतर / नुतनीकरणानंतर सिंचन प्रणाली लाभधारक शेतकऱ्यांच्या पाणीवाटप संस्थकडे हस्तांतर करण्याच्या दृष्टीने आवश्यक त्या दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :

या शासन निर्णयाद्वारे नातूवाडी मध्यम प्रकल्पाच्या ता.खेड, जि.रत्नागिरी या योजनेच्या कालवा प्रणालीच्या पुनस्थापनेच्या (रु.११७०.०३ लक्ष) रुपये अकरा कोटी सत्तर लक्ष तीन हजार मात्र (रु.१११३.६७ लक्ष कामाप्रित्यर्थ व रु.५६.३६ लक्ष आस्थापना व अनुषंगिक खर्चासाठी) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

१) सदर प्रकल्पास महाराष्ट्र सिंचन पद्धतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम, २००५ लागू करावा व त्यातील कलम ६ नुसार प्रकल्प अधिसुचित करण्यात यावा. अशी अधिसूचना काढल्यानंतरच प्रस्तावित दुरुस्तीची कामे हाती घेण्यात यावीत.

२) शासन निर्णय क्र.मजसुप्र-१००६/(६८८/०६),लाक्षेवि(कामे) दि.१४ जून, २००७ अन्वये लघु वितरिकास्तरीय पाणीवापर संस्थांच्या कार्यक्षेत्रातील हस्तांतर पूर्व/ विशेष दुरुस्तीची कामे कंत्राट व्यवस्थापन समिती स्थापन झाल्यानंतरच हाती घेण्यात यावीत.

३) सदर योजनेचे काम एआयबीपी या केंद्र सहाय्यीत योजनेंतर्गत(ERM) विस्तार, नुतनीकरण व परिरक्षण या योजनेखाली करण्यात यावे. यासाठीचा प्रस्ताव केंदाकडून मान्यता मिळण्यासाठी सादर करावा व केंद्राची मान्यता मिळाल्यानंतरच योजनेचे काम हाती घ्यावे.

४) सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

५) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/२००९)/मोप्र-२,दि.१५.१.२०१० मधील सर्व अटींच्या अधीन राहून कामाची दुरुस्ती करण्यात यावी.

या कामावर होणारा खर्च ४७०१ भांडवली खर्च -मोठे व मध्यम पाटबंधारे (विस्तार व सुधारणा/विशेष दुरुस्ती) लेखाशीर्षाखाली टाकावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या

नोंदवहीमध्ये क्र.२२ सन २०११-१२ वर नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४२/का-१२, दि.२२.७.२०११ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ व्यय-१२ दि.४.८.२०११ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०११०९१९१५०५४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत : परिशिष्ट

**( पां. तु. .केदारे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, प्रधान सचिव, नियोजन विभाग(का-१२), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, प्रधान सचिव, वित्त विभाग(व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे,
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई,
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कवारबांव, रत्नागिरी,

अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्र.निधी २०११/(७७/२०११)/सिंव्य(कामे), दिनांक :- १९/०९/२०११ चे प्रपत्र

### परिशीष्ट

| **अ.क्र.** | **शीर्ष/उपशीर्ष** | **अंदाजित किंमत (रु.लक्ष)** |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| | (II)मुख्य कालवे व शाखा कालवे | |
| १ | सी-वर्क्स अस्तरीकरण | ७९०.८९ |
| २ | डी-विमोचक | ६०.२५ |
| ३ | एफ-आरएचटी कामे | २०५.०३ |
| ४ | एल-मातीकाम | २७.५० |
| | एकूण कामाप्रित्यर्थ किंमत | **१११३.६७** |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | ५६.३६ |
| | एकूण अंदाजित किंमत | **११७०.०३** |